**सैन्यातील अपंगत्व प्राप्त झालेल्या महाराष्ट्रातील अधिकारी व जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत- अपंगत्व प्राप्त सुभेदार मळेकर महादेव केरू, जि. बीड.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०२१/प्र.क्र.११३/का-२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०५/०५/२०२२.

वाचा

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक मासैम २०१९/प्र.क्र. ६८/२०१९/२८, दिनांक ०२/०८/२०१९
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०१९/प्रस्ताव/सैकवि-१६/७८०, दि. २२/०४/२०२२.

प्रस्तावना :-

संदर्भाधिन दिनांक ०२/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये, तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत / देशाबाहेरील मोहिमेत अपंगत्व आलेल्या सैनिकांना दि. १ जानेवारी, २०१९ पासून त्यांच्या अपंगत्वाच्या टक्केवारीनुसार आर्थिक मदत देण्यात येते.

**शासन निर्णय :-**

संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संदर्भ क्र. २ येथे नमूद दिनांक २२/०४/२०२२ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार अपंगत्व प्राप्त **सुभेदार मळेकर महादेव केरू, जि. बीड** यांना आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| नाव व पत्ता | अपंगत्व प्राप्त दिनांक, मोहिम व ठिकाण | रक्कम रुपये |
|---|---|---|
| JC-४६११५९ P, सुभेदार मळेकर महादेव केरू, १६ मराठा लाईट इन्फंट्री, पिन- ९११६१६, C/o ५६ APO. | ११/०२/२०२० नौशेरा सेक्टर, जम्मू काश्मिर (ऑपरेशन रक्षक) येथे प्रत्यक्ष नियंत्रण रेषेवर सैन्य कर्तव्यावर असताना दोन्ही पायाच्या मांडीला गोळी लागल्याने १० % अपंगत्व. | रु. २०,००,०००/- |

२. अपंगत्व प्राप्त **सुभेदार मळेकर महादेव केरू** यांना देय रु. २०,००,०००/- (रुपये वीस लाख फक्त) आर्थिक मदतीपैकी ५० % म्हणजे रु. १०,००,०००/-(रुपये दहा लाख फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरित ५०% रक्कम म्हणजे रु.१०,००,०००/- (रुपये दहा लाख फक्त) मा. मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रक्कमेपोटी होणारा खर्च रु. १०,००,०००/-(रुपये दहा लाख फक्त) हा मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२- सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४) देशांतर्गत सुक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त जवानांना आर्थिक मदत (२२३५ २६०८) ५० - इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, बीड यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ०२.०८.२०१९ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०६१२०२४३४००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji gulabrao gore

Digitally signed by Shivaji gulabrao gore
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a914ec7d72351a68d9f12e80317d7512bf6f19c34fee2557e3b3c882cce6f57, pseudonym=FBF0A6AA972F003B5B0C7967AD7B6A3C4FA38DC8, serialNumber=0FB38126D364A4D9F8873B7BC48B4369F1657CA258FC9C6479A27B4D539F409B, cn=Shivaji gulabrao gore
Date: 2022.05.06 12:04:13 +05'30'

**(शिवाजी गोरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३.महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४.कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५.जिल्हाधिकारी, बीड
६.जिल्हा कोषागार अधिकारी, बीड,
७.संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८.जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, बीड,
९.सह संचालक,लेखा व कोषागार,संगणक कक्ष,५वा मजला,नवीन प्रशासनभवन,मुंबई- ३२,
१०. सुभेदार मळेकर महादेव केरू,१६ मराठा लाईट इन्फंट्री, पिन- ९११६१६, C/o ५६ APO.
११.निवड नस्ती (२ प्रती).